**इतर मागास बहुजन कल्याण विभागातील इतर मागास बहुजन कल्याण अधिकारी (गट-ब) यांच्याकडे जिल्हास्तरावरील सहायक संचालक या पदाचा अतिरिक्त कार्यभार सोपविण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**इतर मागास बहुजन कल्याण विभाग**
**शासन परिपत्रक क्रमांकः आस्थाप्र -२०२४/प्र.क्र.३५/आस्थापना-२**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
दिनांक: १५ .०३.२०२४.

वाचा:- १) शासन अधिसूचना दि.९/३/२०१७.
२) शासन निर्णय, इतर मागास बहुजन कल्याण विभाग, क्रमांक आस्थाप्र-२०१७/प्र.क्र.८/ आस्थापना-२, दि.१४/१/२०२१ व दि.२२/३/२०२२.
३) शासन परिपत्रक, इतर मागास बहुजन कल्याण विभाग, क्रमांक- २०२३/प्र.क्र.६४/ आस्थापना-२ दि.२३.११.२०२३
४) शासन परिपत्रक, इतर मागास बहुजन कल्याण विभाग, क्रमांक- २०२३/प्र.क्र.६४ (भाग-१)/ आस्थापना-२ दि.१६.०२.२०२४

परिपत्रक-

शासन अधिसूचना दिनांक ९/३/२०१७ अन्वये सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभागातून इतर मागास बहुजन कल्याण विभागाची स्वतंत्र निर्मिती करण्यात आली आहे.

इतर मागास बहुजन कल्याण या नवीन निर्माण झालेल्या विभागाच्या क्षेत्रीय कार्यालयासाठी वाचा येथील क्र.२ च्या शासन निर्णयान्वये सुधारित आकृतिबंधास मान्यता देण्यात आली आहे.

सदरहू मंजूर सुधारित आकृतिबंधानुसार विविध संवर्गातील २९४ पदे सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभागाकडून वर्ग होणार आहेत, २४७ पदे बाह्ययंत्रणेद्वारे भरावयाची आहे तर २८० पदे नियमित स्वरुपात नियुक्त करावयाची आहेत.

संदर्भ क्र.०३ व ०४ अन्वये सामाजीक न्याय विभागाच्या सहायक आयुक्त, समाज कल्याण यांना इतर मागास बहुजन कल्याण विभागाच्या सहायक संचालक, इतर मागास बहुजन कल्याण या पदाचा अतिरिक्त कार्यभार देण्यात आला आहे.

आता सदर आदेशान्वये सहायक संचालक, इतर मागास बहुजन कल्याण विभाग, नागपूर व वाशिम या पदाचा तात्पुरता अतिरिक्त कार्यभार पुढील आदेशापर्यंत खालीलप्रमाणे सुपुर्द करण्यात येत आहे.

| अ.क्र. | अधिकाऱ्यांचे नाव पदनाम | अतिरिक्त कार्यभार सोपविण्यात आलेले पद व कार्यालय |
|---|---|---|
| १. | श्री. राजेंद्र बा. बुजाडे, इतर मागास बहुजन कल्याण अधिकारी (गट-ब), सहायक संचालक, इतर मागास बहुजन कल्याण,नागपूर. | सहायक संचालक, इतर मागास बहुजन कल्याण, नागपूर. |
| २. | श्रीम. दिपा प्रल्हादराव हेरोळे, इतर मागास बहुजन कल्याण अधिकारी (गट-ब), सहायक संचालक, इतर मागास बहुजन कल्याण,वाशिम. | सहायक संचालक, इतर मागास बहुजन कल्याण, वाशिम. |

सदर अतिरिक्त कार्यभाराच्या कालावधीत त्यांनी खालील बाबींची पूर्तता करुन घ्यावी.

१) इतर मागास बहुजन कल्याण विभागाच्या क्षेत्रिय कार्यालयासाठी जागा उपलब्ध करुन देण्याबाबत तत्कालीन मा.उपमुख्यमंत्री यांच्या अध्यक्षतेखाली घेण्यात आलेल्या दि.५/२/२०२० रोजीच्या बैठकीत सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभागाने त्यांच्या कार्यालयाची ५० टक्के जागा उपलब्ध करुन देण्याबाबत निर्णय झालेला आहे. त्यानुसार सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभागाची जिल्हास्तरीय कार्यालये कार्यरत असलेल्या इमारतीतील ५० टक्के जागा या विभागाच्या जिल्हास्तरीय कार्यालयासाठी जागा ताब्यात घेऊन स्वतंत्र कार्यालये तातडीने कार्यरत करावी.

२) सहाय्यक संचालक यांनी त्यांच्या या विभागाच्या कार्यालयासाठी स्वतंत्र आहरण व संवितरण क्रमांक तातडीने उपलब्ध करुन घेण्यात यावा. तसेच महालेखापाल यांचेकडून आहरण व संवितरण अधिकारी म्हणून प्राधिकृत करुन तसे प्राधिकार पत्र तात्काळ प्राप्त करुन घेण्यात यावे.

३) विभागाचे स्वतंत्र जिल्हास्तरीय कार्यालय कार्यान्वीत करण्यासाठी विभागाने कंत्राटी पदावर मनुष्यबळाचा पुरवठा करण्यासाठी मंजूरी दिलेल्या पुरवठादाराकडून कंत्राटी पदे घ्यावीत, त्याचप्रमाणे कर्मचाऱ्यांची कमतरता भासत असल्यास जिल्ह्यामधील विभागाच्या मान्यताप्राप्त आश्रमशाळांतील अतिरिक्त ठरलेल्या कर्मचाऱ्यांची कामकाज व्यवस्थेंतर्गत नियुक्ती करावी.

४) वर नमूद अधिकाऱ्यांनी त्यांनी त्याच्या मुळ पदांची कर्तव्ये व जबाबदाऱ्या सांभाळुन त्यांचेकडे या आदेशान्वये सोपविण्यात आलेल्या अतिरिक्त पदाचा कार्यभार सांभाळावा.

५) सदर आदेश तात्काळ अमंलात येतील.

सदर परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संगणक सांकेतांक २०२४०३१५२०४९३००९३४ असा आहे. सदर परिपत्रक डिजिटल स्वाक्षरीने स्वाक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

KISHOR ANANDRAO FULZELE

Digitally signed by KISHOR ANANDRAO FULZELE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=OTHER BACKWARD BAHUJAN WELFARE DEPARTMENT, 2.5.4.20=1943ef2dcbb6056b2cde1b40938cb965046d201c95d3481b7d025cdf61d623cb, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=694B6E1A7216778D77DE53247F4CB565CFE21F0250C1211A03A9072F0D671FDD, cn=KISHOR ANANDRAO FULZELE
Date: 2024.03.15 20:59:04 +05'30'

**( किशोर फुलझेले )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.मंत्री (इतर मागास बहुजन कल्याण) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
२. महालेखापाल-१/२ (लेखा परिक्षा व लेखा अनुज्ञेयता), मुंबई/नागपूर.
३. संचालक, इतर मागास बहुजन कल्याण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
४. प्रादेशिक उपसंचालक, इतर मागास बहुजन कल्याण (प्रादेशिक) विभाग, अमरावती/ नागपूर.
५. जिल्हा कोषागार अधिकारी, नागपूर/ वाशिम (सर्व)
६. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई/नागपूर.
७. संबंधीत निवासी लेखा परीक्षा अधिकारी
८. अपर मुख्य सचिव, इतर मागास बहुजन कल्याण विभाग, मंत्रालय, मुंबई यांचे स्वीय सहायक.
९. श्री. राजेंद्र बा. बुजाडे, इतर मागास बहुजन कल्याण अधिकारी (गट-ब), सहायक संचालक, इतर मागास बहुजन कल्याण,नागपूर.
१०. श्रीम. दिपा प्रल्हादराव हेरोळे, इतर मागास बहुजन कल्याण अधिकारी (गट-ब), सहायक संचालक, इतर मागास बहुजन कल्याण,वाशिम.
११. निवडनस्ती (आस्था-२)